**समुद्र किना-यांच्या नावात बदल करणे व जीव सुरक्षा रक्षकांना मानधन देणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
### शासन निर्णय क्रमांकः -व्हीपीएम-२०१६/प्र.क्र.३२०/पंरा-३

बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई
तारीखः - ३ मार्च,२०१७.

**वाचा-**

१) शासन निर्णय क्रमांक व्हीपीएम-२०१६/प्र.क्र.३२०/पंरा-३, दि.२९.९.२०१६.
२) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सिंधुदुर्ग यांचे पत्र क्र.सिंजिप/सासु/का-४/२४७९/१६ दि.२७.१०.२०१६
३) उपमुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी यांचे पत्र क्र.रजिप/साप्रवि/ग्रापं/कार्या५/४३२६/२०१६ दि.३०.९.२०१६
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पालघर यांचे पत्र क्र.जा.क्र.पाजिप/ग्रापं/तक्रार-२/वशी/२२ दि.२३.०१.२०१७

**प्रस्तावना -**

पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागाने त्यांच्या क्रमांक-टीडीसी-२००६/३/प्र.क्र.६/पर्यटन, दिनांक ११ सप्टेंबर २००६ रोजीच्या पत्रान्वये मा.मुंबई उच्च न्यायालयास सादर केलेल्या समुद्रकिना-यांच्या यादीप्रमाणे या विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ च्या शासन निर्णयान्वये प्रत्येक समुद्रकिना-यास रू.१,३४,०००/- इतका निधी उपलब्ध करून दिला आहे. त्याचा तपशील खालीलप्रमाणे आहे.

| अ.क्र. | प्रती समुद्र किनारा जीव सुरक्षा रक्षकांची संख्या | प्रती जीव सुरक्षा रक्षक मानधन (रुपये प्रती महिना) | जीव सुरक्षारक्षक सन २०१६-१७ या आर्थिक वर्षातील उर्वरित महिन्यांकरिता मानधन (माहे सप्टें. २०१६ ते मार्च २०१७) | आवश्यक उपाययोजनाकरिता अनुषंगिक वार्षिक खर्च | एकूण खर्च (रूपये) |
|---|---|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** | **५** | **६** |
| १ | २ | ६०००/- | ८४,०००/- | ५०,०००/- | १,३४,०००/- |

२. पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागाने त्यांच्या दिनांक ११ सप्टेंबर २००६ रोजीच्या पत्रान्वये मा.मुंबई उच्च न्यायालयास सादर केलेल्या समुद्रकिना-यांच्या यादीमध्ये नमूद असलेल्या रत्नागिरी जिल्ह्यातील भाट्ये समुद्रकिना-यास संदर्भाधीन क्र.१ च्या शासन निर्णयान्वये निधी उपलब्ध करून देण्यात आलेला नाही. सबब संदर्भाधीन क्र.३ च्या पत्रान्वये उपमुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी यांनी भाट्ये ग्रामपंचायतीस निधी उपलब्ध करून देण्याची विनंती केली आहे.

३. तसेच पालघर जिल्ह्यातील केळवा-माहिम समुद्रकिना-यास संदर्भाधीन क्र.१ च्या शासन निर्णयान्वये निधी उपलब्ध करून देण्यात आलेला आहे. तथापि संदर्भाधीन क्र.४ च्या पत्रान्वये मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पालघर यांनी केळवा व माहिम या स्वतंत्र ग्रामपंचायती असल्याने केळवा व माहिम समुद्रकिना-यांकरीता स्वतंत्रपणे निधी उपलब्ध करून देण्याची विनंती केली आहे.

४. सिंधुदुर्ग जिल्ह्यातील देवबाग वायरी तारकर्ली"ग्रामपंचायतीस, "अरवली वेळागर" ग्रामपंचायतीस, खवणे ग्रामपंचायीस संदर्भाधीन क्र.१ च्या शासन निर्णयान्वये निधी उपलब्ध करून देण्यात आला आहे. तथापि संदर्भाधीन क्र.२ च्या पत्रान्वये मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सिंधुदुर्ग यांनी देवबाग वायरी तारकर्ली या स्वतंत्र ग्रामपंचायती असल्याने देवबाग, वायरी व तारकर्ली या समुद्रकिना-यांकरीता स्वतंत्र निधी उपलब्ध करून देण्याची विनंती केली आहे. तसेच अरवली व सागरतिर्थ अशा दोन स्वतंत्र ग्रामपंचायतींची निर्मिती झाली असून अरवली ग्रामपंचायत हद्दीमध्ये समुद्रकिनारा नसल्याने समुद्रकिना-याचे नाव अरवली- सागरतिर्थ-वेळागर करण्याची व खवणे समुद्रकिनारा म्हापण ग्रामपंचायतीच्या हद्दीत असल्याने खवणे समुद्रकिना-याचे नाव म्हापण-खवणे करण्याची विनंती केली आहे.

## शासन निर्णय-

५. सिंधुदुर्ग, रत्नागिरी व पालघर जिल्ह्यांकरीता संदर्भाधीन क्र.२ ते ४ येथील पत्रांच्या अनुषंगाने खालील समुद्रकिना-यांना माहे सप्टें. २०१६ ते मार्च २०१७ या कालावधीकरीता खालीलप्रमाणे निधी उपलब्ध करून देण्यात येत आहे.

| अ.क्र. | जिल्हा | समुद्र किनाऱ्याचे नांव | एकूण खर्च (रूपये) |
|---|---|---|---|
| १ | रत्नागिरी | भाट्ये | १,३४,०००/- |
| २ | पालघर | माहिम | १,३४,०००/- |
| ३ | सिंधुदुर्ग | वायरी | १,३४,०००/- |
| ४ | | तारकर्ली | १,३४,०००/- |
| | **एकूण खर्च** | | **५,३६,०००/-** |

६. त्याचप्रमाणे संदर्भाधीन शासन निर्णयातील परि.३ मधील अनु.क्र.१५ येथे नमूद "केळवा-माहिम" ऐवजी "केळवा" असे वाचावे, अनु.क्र.२७ येथे नमूद "देवबाग वायरी तारकर्ली" ऐवजी

"देवबाग" असे वाचावे,अनु.क्र.३१ येथे नमूद "अरवली वेळागर" ऐवजी "अरवली-सागरतिर्थ - वेळागर" असे वाचावे. तसेच अनु.क्र.३४ येथे नमूद "खवणे" ऐवजी "म्हापण-खवणे" असे वाचावे.

७. उपरोक्त नमूद केलेल्या समुद्रकिना-यांकरीता माहे सप्टेंबर,२०१६ ते मार्च २०१७ या कालावधीकरीता प्रती समुद्र किनारी दोन जीव सुरक्षा रक्षक, प्रती जीव सुरक्षा रक्षक मानधन रूपये ६०००/- प्रतीमाह मानधनावर नियुक्त करण्यास मान्यता देण्यात येत आहे. त्याचप्रमाणे प्रती समुद्र किनारी सुरक्षाविषयक उपाययोजनेकरीता अनुषंगिक वार्षिक खर्च रूपये ५०,०००/- देण्यास मान्यता देण्यात येत आहे. त्यानंतर पुढील वर्षापासून संबंधित ग्रामपंचायतींनी सदर बाबींसाठी स्वउत्पन्नातून तरतूद करावी.

८. कोकण ग्रामीण पर्यटन विकास कार्यक्रम व समुद्र किना-यांवर (बीचेस) पर्यटकांसाठी सुरक्षा व्यवस्था करणे यांचा परस्परपूरक संबंध विचारात घेता फक्त चालू वर्षाकरीता माहे सप्टेंबर, २०१६ ते मार्च २०१७ या कालावधीकरीता कोकण ग्रामीण पर्यटन विकास कार्यक्रमाच्या लेखाशीर्ष २५१५ २४३२ अंतर्गत अर्थसंकल्पीय तरतुदीतून जीव सुरक्षारक्षकांचे मानधन व समुद्र किनारी करावयाच्या सुरक्षाविषयक उपाययोजनेच्या वार्षिक अनुषंगिक खर्चाकरिता रू.५,३६,०००/-(रूपये पाच लाख छत्तीस हजार फक्त) निधी उपलब्ध करून देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३०२१२२७४२५४२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay R Bankar

Digitally signed by Sanjay R Bankar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=RDD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c8a7d6860ff227fd9e69a02e9ca5dfb2ccb25eda92d749629970f349fc6ed260, cn=Sanjay R Bankar
Date: 2017.03.03 17:48:28 +05'30'

**(संजय बनकर)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
३. मा. मंत्री(ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
४. मा. राज्यमंत्री( ग्रामविकास)यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
५. मा. मुख्य सचिव, मंत्रालय मुंबई-३२
६. प्रधान सचिव (पर्यटन) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,मंत्रालय,मुंबई.

७. सचिव, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, बांधकाम भवन, मुंबई.
८. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी /सिंधुदुर्ग /पालघर
९. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा रत्नागिरी /सिंधुदुर्ग /पालघर
१०.उपसचिव (कोकण ग्रामीण पर्यटन विकास कार्यक्रम) ग्रामविकास व जलसंधारण विभाग, बांधकाम भवन, मुंबई
११. उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत), जिल्हा परिषद, रत्नागिरी /सिंधुदुर्ग / पालघर
१२.मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी /सिंधुदुर्ग /पालघर
१३.मा.महालेखापाल, मुंबई/नागपूर
१४.निवडनस्ती-कार्यासन पंरा-३.